अधीक्षक, जिल्हा कारागृह वर्ग-२/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट-ब राजपत्रित या पदावर पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्र. जेएलई-०४२४/प्र.क्र.८०/तुरुंग-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ ऑगस्ट २०२४.

**संदर्भ** :-

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव दि.०४.०१.२०२४.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१८/प्र.क्र. १५९/कार्यासन-१२, दि.०१.०८.२०१९.
३. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि.१४.०७.२०२१.

**शासन आदेश :-**

गृह विभागाच्या अधिनस्त कारागृह विभागातील अधीक्षक, जिल्हा कारागृह वर्ग-२/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट-ब राजपत्रित या संवर्गातील रिक्त पदे भरण्यासाठी अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.०४.०१.२०२४ रोजी प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या आधारे तयार केलेल्या निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून नागरी सेवा मंडळाची बैठक दि.२६.०७.२०२४ रोजी पार पडली. सदर बैठकीतील शिफारशीस अनुसरून तुरूंगाधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील खालील पात्र अधिकाऱ्यांना अधीक्षक, जिल्हा कारागृह वर्ग-२/उपअधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट-ब (राजपत्रित) या पदावर तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत असून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी त्यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | प्रवर्ग | महसुल संवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | श्री. विजय ज्ञानेश्वर कांबळे | भज.ब | पुणे | सांगली जिल्हा कारागृह. |
| २ | श्री. उमरावसिंग प्रताप पाटील | खुला | कोकण-२ | कल्याण जिल्हा कारागृह. |
| ३ | श्री. प्रदीप ओंकार इंगळे | इ.मा.व. | अमरावती | अमरावती मध्यवर्ती कारागृह. |
| ४ | श्री. विलास पंडीत कापडे | इ.मा.व. | कोकण-२ | ठाणे मध्यवर्ती कारागृह. |
| ५ | श्री. संदीप पांडुरंग भुतेकर | इ.मा.व. | छत्रपती संभाजीनगर. | छत्रपती संभाजीनगर मध्यवर्ती कारागृह. |
| ६ | श्री. श्रीधर परसरामजी काळे | अ.जा. | नागपूर | नागपूर मध्यवर्ती कारागृह. |
| ७ | श्री. बाळराजेंद्र चोखाजी निमगडे | अ.जा. | छत्रपती संभाजीनगर. | खुले जिल्हा कारागृह, पैठण. |

२. मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून पदे भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निर्देशानुसार अधीक्षक, जिल्हा कारागृह वर्ग-२/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट-ब राजपत्रित या संवर्गातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार सदर

पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिकेच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी उपरोक्त अधिकाऱ्यांना नियमितपणा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या पदावर १५ दिवसात रुजू व्हावे. पदोन्नतीच्या पदावर रुजू होऊन कार्यभार स्विकारल्यानंतरच त्यांना अधीक्षक, जिल्हा कारागृह वर्ग-२/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट-ब राजपत्रित या संवर्गाच्या वेतनाचे लाभ अनुज्ञेय राहतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेतांक २०२४०८१६१५१६३९३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2024.08.16 15:32:39 +05'30'

**( विनायक चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. विशेष पोलीस महानिरीक्षक (मुख्यालय), कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर/ नाशिक विभाग, नाशिक.
६. कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई/पूर्व विभाग, नागपूर/पश्चिम विभाग, पुणे.
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हे.
१०. संबंधित अधिकारी (मार्फत अपर पोलीस महासंचाकलक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे)
११. निवडनस्ती/तुरुंग-१.